**डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त दिक्षाभूमी, चंद्रपूर येथे डॉ.बाबासाहेब आंबेडकर भवन बांधकामाकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक सान्यावि-२०१६/ प्र.क्र.६११/ बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०८ मार्च, २०१७

वाचा :- १) शासन निर्णय क्र. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग बीसीएच-२०१४/प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.१६/१२/२०१५

२) जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांचे पत्र क्र.सकवि/१२५ जयंती/ डॉ.आंबेडकर भवन/१२६५/१६, दि.३०/८/२०१६.

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील मान्यवर व्यक्तींचे स्मारक बांधणे तसेच सांस्कृतिक व ऐतिहासिक दृष्टया महत्व असलेल्या स्थळांचा विकास करणे यासाठी स्वयंसेवी संस्थांना अनुदान मंजूर करण्याविषयीचे निकष व मार्गदर्शक तत्वे संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केली आहेत. संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांनी अध्यक्ष, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मेमोरीयल सोसायटी, चंद्रपूर यांनी दीक्षाभूमी चंद्रपूर येथे डॉ.बाबासाहेब आंबेडकर भवन बांधण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. दि.१६ ऑक्टोबर, १९५६ ला भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांनी तीन लाखांपेक्षा जास्त लोकांना बौध्द धर्माची दीक्षा दिली. या दिवसाची साक्ष म्हणून प्रत्येक वर्षी दीक्षाभूमी, चंद्रपूर येथे १५ व १६ ऑक्टोबरला धम्मचक्र अनुप्रवर्तन समारंभ साजरा केला जातो. दीक्षाभूमीला येणाऱ्या अतिथींनी वेळोवेळी या ठिकाणी डॉ.बाबासाहेब आंबेडकर भवन बांधण्याची आवश्यकता बोलून दाखविली आहे. तद्नुषंगाने अध्यक्ष, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मेमोरीयल सोसायटी, चंद्रपूर यांनी दीक्षाभूमी चंद्रपूर येथे डॉ.बाबासाहेब आंबेडकर भवन बांधण्याबाबत सादर केलेल्या रुपये रु.७५,७९,३४०/-(रुपये पंच्याहत्तर लाख एकोणऐंशी हजार तीनशे चाळीस फक्त) इतक्या अंदाजित रकमेच्या प्रस्तावास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये विहित निकषांच्या पूर्तीच्या अधीन तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अध्यक्ष, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मेमोरीयल सोसायटी, चंद्रपूर यांनी दीक्षाभूमी चंद्रपूर येथे डॉ.बाबासाहेब आंबेडकर भवन बांधण्याबाबत सादर केलेल्या रु.७५,७९,३४०/-(रुपये पंच्याहत्तर लाख एकोणऐंशी हजार तीनशे चाळीस फक्त) इतक्या अंदाजित रकमेच्या प्रस्तावास तत्वत: मान्यता देण्यात

येत आहे. सदर मान्यता संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयांतील अटींची पूर्तता करण्याच्या अधीन तसेच खालील बाबींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) सदर कामाचे अंदाजपत्रक व आराखडे सार्वजनिक बांधकाम विभागाकडून प्रमाणित करुन घेण्यात यावे. प्रस्तुत प्रकल्पाच्या सविस्तर प्राकलनास मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि.चंद्रपूर यांचे साक्षांकन घेण्यात यावे.

२) प्रकल्पाचा नमुना नकाशा, वास्तु-मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेण्यात यावी. तसेच प्रकल्पाचे बांधकाम हाती घेण्यापुर्वी स्थानिक नगररचना प्राधिकरणाची मंजूरी घेण्यात यावी.

३) प्रकल्पाचे काम सुरु करण्यापूर्वी सहायक आयुक्त, समाजकल्याण, चंद्रपूर यांनी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

४) या कामी शासन निर्णय क्र.बीसीएच-२०१४/प्र.क्र.६१/बांधकामे, दि.१६/१२/२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय समितीने नियमानुसार ई- निविदा प्रक्रिया राबवून बांधकाम यंत्रणा निश्चित करुन काम हाती घ्यावे.

५) प्रकल्पाचे प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यवी.

६) प्रस्तुत प्रकल्पाचे बांधकाम सा.बां.विभागाने विहित केलेल्या मानकानुसार, विहित दर्जाचे व गुणवत्तेचे राहील, याकरीता प्रकल्पाची सा.बां.वि.च्या सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत नियतकालीक तपासणी करुन घेणे आवश्यक राहील.

७) प्रस्तुत प्रकल्पातील इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुविजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:र्भरण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

८) सहायक आयुक्त, समाजकल्याण यांनी प्रकल्पाच्या बांधकामाच्या सद्य:स्थितीचा त्रैमासिक अहवाल आणि वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व आयुक्त, समाजकल्याण,पुणे यांना वेळीच सादर करण्याची दक्षता घ्यावी.

९) प्रस्तुत प्रकल्पातील बांधकामाचा कालावधी निश्चित करुन ते विहित वेळेतच पूर्ण होईल, याची संबंधित सहायक आयुक्त, समाजकल्याण, चंद्रपूर यांनी दक्षता घ्यावी.

१०) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच प्रकल्पाचे काम पूर्ण करण्याची जबाबदारी संबंधित सहायक आयुक्त, समाजकल्याण, चंद्रपूर व कार्यकारी अभियंता, सा.बां.वि यांची राहील.

११) प्रस्तुत प्रकल्पामध्ये अपंगांना सोयी सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

१२) या प्रकल्पातील इमारत बांधकामाची मालकी ही शासनाची राहील व प्रकल्पाच्या देखभाल व परिरक्षणाची जबाबदारी ही डॉ.बाबासाहेब आंबेडकर मेमोरीयल सोसायटी, चंद्रपूर यांची राहील.

४. प्रस्तुत इमारत बांधकामाकरीता त्या त्या टप्प्यावरील आवश्यक निधी उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल. यावरील खर्च हा मागणी क्र.एन-३, २२२५-अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१-अनुसूचित जातीचे कल्याण, ८००, इतर खर्च, पंचवार्षिक योजनातंर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना, (०५), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने, (०५)(०२) स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (वि.घ.यो.)(२२२५ ३६३६), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

५. या करीता आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांनी या कामासाठीचा निधी, वित्त विभागाने विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार त्या त्या टप्प्यावर सदरहू कामाकरीता वितरीत करावा.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थहावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३०८१७२४२२७७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justic and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d81b5c910bad5837d7f88ac97a75b312f0e5744ecbdc45b7704dcb27f5d4dfef, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2017.03.08 17:24:33 +05'30'

**(अ.कों.आहिरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.सभापती, विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, विधानसभा, विधान भवन, मुंबई.
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव

६. मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
७. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
८. सर्व विधानसभा/विधान परिषद सदस्य
९. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे.
१२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर.
१३. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर.
१४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर.
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/ नागपूर.
१६. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, चंद्रपूर.
१७. सहायक आयुक्त, समाजकल्याण, चंद्रपूर.
१८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ चंद्रपूर.
१९. निवडनस्ती / बांधकामे.